उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील इमारत दुरूस्ती व पाण्याच्या टाकीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१४/ प्र.क्र.२४/ आरोग्य-४.**

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ११ मार्च, २०१५.

**वाचा**

१) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे-६/बांध.सावंतवाडीदुरू/३-६७७-६७९/१५,दि.२९.०१.२०१५.**

**प्रस्तावना**

उपसंचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळाच्या अधिनस्त उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील इमारतीच्या छप्पर दुरूस्ती, नवीन छप्पर करणे व पाण्याची टाकी बांधकाम करणे इ.बांधकामांची एकूण रूपये ३३,८४,४००/- इतक्या किंमतीची एकूण ४ अंदाजपत्रके व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी संदर्भाधीन पत्रान्वये शासनास प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रक व आराखडे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत आहेत. सदर अंदाजपत्रके कनिष्ठ अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, सावंतवाडी, जि. सिंधुदुर्ग, उप विभागिय, अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१,सावंतवाडी व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग यांनी प्रमाणित केलेले आहेत. तसेच जिल्हा शल्य चिकित्सक, सिंधुदुर्ग यांनी साक्षांकित केले आहेत. या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील इमारतीच्या छप्पर दुरूस्ती, नवीन छप्पर करणे व पाण्याची टाकी बांधकाम करणे इ.बांधकामांच्या एकूण ४ अंदाजपत्रकांतील कामांचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | कामाचा प्रस्तावित खर्च रू. |
|---|---|---|
| १. | उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी येथील छप्पराची दुरूस्ती | १६,१३,०००.०० |

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | कामाचा प्रस्तावित खर्च रू. |
|---|---|---|
| | करणे, भाग-१ | |
| २. | उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी येथील कॉटेज हॉस्पिटल ५० खाटांच्या इमारतीवर पावसाळी छप्पर करणे | १३,८६,०००.०० |
| ३. | सावंतवाडी, जि. सिंधुदुर्ग येथील कॉटेज हॉस्पिटल येथील नवीन पाण्याची टाकी बांधणे. | १,९२,७००.०० |
| ४. | सावंतवाडी, जि. सिंधुदुर्ग येथील कॉटेज हॉस्पिटल येथील ५० खाटांच्या इमारतीच्या आवारात नवीन पाण्याची टाकी बांधणे. | १,९२,७००.०० |
| | **एकूण** | **३३,८४,४००.००** |

उपरोक्त उपजिल्हा रूग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील इमारतींच्या छप्पर दुरूस्ती, नवीन छप्पर करणे व पाण्याची टाकी बांधकाम करणे इ. बांधकामांच्या एकूण रूपये ३३,८४,४००.०० (अक्षरी रूपये तेहेतीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार चारशे फक्त ) किंमतीच्या ४ अंदाजपत्रकांना खालीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) या कामांसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिका-यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) निधी अर्थसंकल्पित झाल्याशिवाय कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

३) निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात यावा.

**मागणी क्र. एच-८**

| | |
|---|---|
| ४२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य ) |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| (१)(अ)- | पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती |
| (००) (०१)- | मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ ) |
| ५३- | मोठी बांधकामे |

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १० परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१५००२११४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.11 16:24:20 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सिंधुदुर्ग.
७. अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदुर्ग.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.